विभागीय आयुक्त यांच्या अस्थापनेवरील व नगरपालिका प्रशासन संचालनालय यांच्या आस्थापनेवरील (विभागस्तर) १४ कार्यरत अस्थायी पदांना दि.०१.०३.२०२५ ते दि.३१.०८.२०२५ पर्यंत मुदतवाढ मिळाणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:- एमसीओ-२०२५/प्र.क्र.१२०/नवि-१४**

मंत्रालय,मुख्य इमारत, ४ था मजला,
हुतात्मा राजगुरु चौक,
मादाम कामा मार्ग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- २९ एप्रिल, २०२५.

**वाचा:**

१) शासन निर्णय महसूल व वन विभाग, क्र.ईएसटी-२२०३/सीआर-४३/ई-८, दि.०१.१०.२००५ व शुद्धीपत्रक समक्रमांक दि.१५.०२.२००६.

२) शासन निर्णय, नगर विकास विभाग क्र. नपाप्र १०२००३/ १०१५/ प्र.क्र.३७/ २००३/ प्र.क्र.३७/ २००३/नवि-१६, दि.०१.१०.२००३.

३) नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र.एमसीओ-२०२३/प्र.क्र.३७/नवि-१४, दि.१२.०४.२०२४

४) नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र.एमसीओ-२०२४/प्र.क्र.१०४/नवि-१४, दि.०७.१०.२०२४

५) नगरपरिषद प्रशासन संचलनालय यांचे पत्र क्र. नपप्रसं/आस्था/ आकृतिबंध / २०२५/कक्ष-१/१७५६, दि.२४.०२.२०२५.

६) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.०३.०३.२०२५

**प्रस्तावना**

महसूल व वन विभागाच्या अ.क्र.१ येथील आदेशान्वये विभागीय आयुक्त कोकण, पुणे, नागपूर, नाशिक, छत्रपती संभाजीनगर व अमरावती यांच्या आस्थापनेवरील नगरपालिका प्रशासन कामकाज करण्यासाठी निर्माण केलेली ३६ पदे या विभागाकडे वर्ग करण्यात आलेली आहेत. विभागीय आयुक्त यांच्या आस्थापनेवरील कार्यरत १४ अस्थायी पदांना व नगरपालिका प्रशासन संचालनालय यांच्या आस्थापनेवरील (विभागस्तर) येथे कार्यरत १ अस्थायी पदांला संदर्भ क्र.४ च्या शासन निर्णयान्वये दि.२८.०२.२०२५ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती. आता संदर्भ क्र.६ येथील वित्त विभागाच्या दि.०३.०३.२०२५ रोजीच्या शासन निर्णयान्वये वित्त विभागाने प्रशासकीय विभागास दिलेल्या अधिकारात व सदर शासन निर्णयातील अटीच्या अधीन राहून संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय यांनी संदर्भ क्र.५ अन्वये प्रस्तावित केल्यानुसार विभागीय आयुक्त यांच्या आस्थापनेवरील कार्यरत १३ अस्थायी पदांना व नगरपालिका प्रशासन संचालनालय यांच्या आस्थापनेवरील (विभागस्तर) येथे कार्यरत १ अस्थायी पदांला मुदतवाढ देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**<u>शासन निर्णय</u>:-**

नगरपरिषद प्रशासन संचालनालयाने सादर केलेल्या प्रस्तावानुसार, वित्त विभागाच्या दि.०३.०३.२०२५ रोजीच्या शासन निर्णयानुसार तसेच, नगर विकास विभागाच्या शासन निर्णय दि.०५.०८.२०२० अन्वये मान्यता देण्यात आलेल्या नगरपरिषद प्रशासन संचालनालयाच्या सुधारीत आकृतीबंधानुसार संबंधीत पदांवर पदोन्नती / प्रतिनियुक्ती प्रक्रीया पुर्ण होऊन संबंधित पदनिहाय पदस्थापना होईपर्यंत अथवा दि.३१.०८.२०२५ यापैकी आधी येणारा दिनांक या कालावधीसाठी विभागीय आयुक्त यांच्या आस्थापनेवरील ३६ अस्थायी पदांपैकी कार्यरत विभागीय आयुक्त यांच्या आस्थापनेवरील कार्यरत १३ अस्थायी पदांना (विवरणपत्र १) व नगरपालिका प्रशासन संचालनालय यांच्या आस्थापनेवरील (विभागस्तर) येथे कार्यरत १ अस्थायी पदाला (विवरणपत्र २) मुदतवाढ देण्यात येत आहे.

२. सर्व विभागीय आयुक्त तथा प्रादेशिक संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय यांनी उपरोक्त १४ पदांचे वेतन भत्ते यावर होणारा खर्च सन २०२४-२०२५ साठी मागणी क्र. एफ-२, मुख्य लेखाशिर्ष २२१७-नगर विकास ८० सर्वसाधारण-००१, संचालनालय प्रशासन (००) (०१) संचालक नगरपरिषद प्रशासन (२२१७००४७)०१ वेतन या लेखाशिर्षाखालील मंजुर तरतूदीतुन भागविण्यात यावा.

३. शासन निर्णय वित्त विभाग क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क.,दि.०३.०३.२०२५ नुसार प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या प्राधिकारानुसार हा शासन निर्णय निर्गमित करण्यांत येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२५०४२९१५१४३३७०२५ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

C PRIYANKA

Digitally signed by C PRIYANKA
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=2295c5c50b6a2aa03b2654fd2f5f69a709a20ae44359c483f3e1b0d4450728d0, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=55FDD77FA8877B50FD182206F763C590C30CE698809F79D37B145FD63E375059, cn=C PRIYANKA
Date: 2025.04.29 15:16:49 +05'30'

**(प्रियांका कुलकर्णी-छापवाले)**
**शासनाच्या उप सचिव**

**प्रति:-**

१) आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी मुंबई-४०० ०९८.
२) सर्व विभागीय आयुक्त तथा प्रादेशिक संचालक
३) जिल्हाधिकारी, सर्व
४) सर्व जिल्हा कोषाधिकारी
५) महालेखापाल-महाराष्ट्र१/२, (लेखापरिक्षा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर

६) महालेखापाल(लेखापरिक्षा)मुंबई/नागपूर

७) वित्त विभाग,अर्थसंकल्प-३, व्यय-३ मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

८) कार्यासन-ई-८, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई

९) मुख्याधिकारी, नगरपरिषदा(सर्व)

१०) प्रधान सचिव (नवि-२) यांचे स्वीय सहायक, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई

११) कार्यासन अधिकारी, (नवि-१५,१६,१७,१८,१९,२०,२४,२७), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

१२) निवडनस्ती (नवि-१४)

(नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र-एमसीओ-२०२५/प्र.क्र.१२०/नवि-१४,दि. २९.०४.२०२५ सोबतची विवरणपत्रे)

विवरणपत्र -१

| अ.क्र. | विभागीय आयुक्त | एकुण पद संख्या | नगरपालिका प्रशासनासाठी कार्यरत असलेली पदे | मुदतवाढ देण्याचे प्रस्तावित असलेली पदे |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | नाशिक | ५ | निरीक्षक -१,अव्वल कारकुन-५ | शासन निर्णय, महसुल व वन विभाग क्र. ईएसटी-२२०३/प्र.क्र.४३/ई-८, दि.०१.१०.२००५. |
| २ | छत्रपती संभाजी नगर | ५ | अव्वल कारकून-४,लिपिक- टंकलेखक -१ | वरीलप्रमाणे |
| ३ | नागपूर | ३ | अव्वल कारकुन-३ | वरीलप्रमाणे |
| | एकुण | १३ | | |

विवरणपत्र-२

| अ.क्र. | विभागीय आयुक्त | एकुण पद संख्या | नगरपालिका प्रशासनासाठी कार्यरत असलेली पदे | मुदतवाढ देण्याचे प्रस्तावित असलेली पदे |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | छत्रपती संभाजी नगर | १ | निरीक्षक-१. | शासन निर्णय, नगर विकास विभाग क्र. नपाप्रस १०२००३/ १०१५/प्र.क्र.३७/२००३/नवि -१६, दि.०१.१०.२००३. |
| | एकुण | १ | | |

--x--

C PRIYANKA

Digitally signed by C PRIYANKA
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=2295c5c50b6a2aa03b2654fd2f5f69a709a20ae4435 9c483f3e1b0d4450728d0, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=55FDD77FA8877B50FD182206F763C590C30C E698809F79D37B145FD63E375059, cn=C PRIYANKA
Date: 2025.04.29 15:17:28 +05'30'